# ओळख परेड

**-- चं.प्र.देशपांडे**

दत्ताजीराव आरामखुर्चीवर स्वस्थ बसलेले आहेत. वय सुमारे पन्नास. आजूबाजूला एकदोन खुर्च्या आणि टीपॉय. समोर दरवाजा उघडा. काही क्षण असे जातात. मग प्रदीपकुमार -- सुमारे पंचेचाळीस -- प्रवेश करतात.

प्रदीपकुमारः ( दत्ताजीरावांकडे पाहून, हसून ) नमस्कार दत्ताजीराव.

दत्ताजीरावः हं. या. ( हालचाल नाही.) प्रदीपकुमार ! या ! बसा !

प्रदीपकुमारः म्हटलं आज सुट्टी असेल तुम्हाला.

दत्ताजीरावः आहे ना ! आहे !

प्रदीपकुमारः काय ?

दत्ताजीरावः सुट्टी आहे.

प्रदीपकुमारः हं हं. तर म्हटलं भेटून यावं. काय, काय करताय काय ?

दत्ताजीरावः काही नाही. बसलोय.

प्रदीपकुमारः म्हटलं माझाही वेळ जाईल, तुमचाही जाईल.

दत्ताजीरावः हं.

प्रदीपकुमारः काय, बसून काय करताय ?

दत्ताजीरावः काही नाही. नुसता बसलोय.

प्रदीपकुमारः फिरायला जायचं का जरा ? तेवढेच पायही मोकळे होतील आणि वेळही जाईल. नुसतं बसून काय करताय ?

दत्ताजीरावः याचं नाही मला उत्तर सांगता येणार. नुसतं बसणं हेच करतोय.

प्रदीपकुमारः पण येताय का फिरायला ?

दत्ताजीरावः तुम्ही या जाऊन.

प्रदीपकुमार फिरून आल्यावर बरं वाटतं जरा. नुसतं बसून बसून कंटाळा नाही येत ?

दत्ताजीरावः प्रदीपकुमार, तुमच्या मनाचं जे काय चाललेलं असतं ते सगळंच तसंच सगळ्यांचं चाललेलं असतं असं वाटतं का तुम्हाला ?

प्रदीपकुमारः म्हणजे ? मी समजलो नाही दत्ताजीराव.

दत्ताजीरावः मला स्वस्थ बसून फिरायला गेल्याचा आनंद मिळतो. याच्यावर काय म्हणणं आहे तुमचं ?

प्रदीपकुमारः मग स्वस्थ बसणं आणि फिरायला जाणं याच्यात फरकच राहिला नसता. फिरायला जायचा विषय मी तरी कशाला काढला असता मग ?

दत्ताजीरावः पण मला फिरायला यायचं नाही.

प्रदीपकुमारः का ?

दत्ताजीरावः फिरायला जाणं हा एक भ्रम आहे तुमचा.

प्रदीपकुमारः इल्यूजन ? म्हणजे फिरायला जाण्यानं आनंद वाटतो हा इल्यूजन आहे की फिरायला जाणं हाच इल्यूजन आहे ? सूक्ष्म फरक आहे याच्यात. डू यू सी इट ?

दत्ताजीरावः फिरायला जाणं हाच.

प्रदीपकुमारः ( लाचारीनं ) असं नका करू दत्ताजीराव. अहो दारू हा एक खरोखर इल्यूजन होता. तुमच्या सहवासात आल्यापासून त्यातनं मुक्त झालो मी. पण असं नका करू.

दत्ताजीरावः काय ?

प्रदीपकुमारः अहो, फिरायला जाणं ही तर खरीच गोष्ट आहे नं ? राहिलं काय मग माझ्याकडे ? हेही गेलं म्हणजे संपलंच मग सगळं. काहीच शिल्लक नाही, तर राहणार काय मग ? नाही, नाही, असं नका करू.

दत्ताजीरावः प्रदीपकुमार, तुम्ही वेडे आहात.

प्रदीपकुमारः नाही, नाही, असं नका करू. प्लीज. मला तुम्ही वेडा म्हटलं की मला माहिती आहे. तो मुद्दा आता गळी उतरवणारच तुम्ही माझ्या. प्लीज असं नका करू.

दत्ताजीरावः ते नाही मी तुम्हाला पटवून देत. मी दुसरंच म्हणत होतो. आहे का उत्सुकता ?

प्रदीपकुमारः मला सगळं माहिती आहे. तुम्ही आधी मला काय दुसरं ते पटवून देणार आणि मग त्याच्यातून पहिलं मला आपोआप पटणार.

दत्ताजीरावः अहो पण तुम्हाला एखादी गोष्टी पटली तर तुमचीच झाली नं ती ! एकदा पटल्यावर मग शांतच असणार आहे तुम्ही. पण पटलेलं नसताना आत्ता कशाला उगीचच धडपड करताय ? भिकारड्यासारखी ? i पटू नये म्हणून ? पटावं का पटू नये हे आधीच कशाला ठरवताय ?

प्रदीपकुमारः बघितलंत ! ही पहिली पायरी ! ते जर पटलं तर माझं सगळंच संपतंय हो ! माझी धडपड बंद पाडणं यात तुमचं निम्मं यश आहे.

दत्ताजीरावः आणि उरलेलं निम्मं कशात आहे ?

प्रदीपकुमारः पटवून देण्यात ! झालं ! संपलं सगळं ! नुसतं फुकटात फिरायला जाता येत होतं ! तेही गेलं !

दत्ताजीरावः बरं, प्रदीपकुमार, मला एक सांगा, मी कुठलंही पटवलेलं सोडून बाकीचं जे काही तुमचं आहे ते कसं काय आहे ?

प्रदीपकुमारः जाऊ द्या आता, दत्ताजीराव -- जास्त खोलात काही जायला नको. तुमच्या सहवासात आल्यानं दारू सुटलीय माझी हीच एक मोठी गोष्ट आहे.

दत्ताजीरावः मी एका शब्दानं तरी कधी म्हटलं होतं का तुम्हाला की दारू सोडा म्हणून ?

प्रदीपकुमारः हीच तर खुबी आहे ना तुमच्यात ! मला मोकळा वेळ मिळाला की तुमच्याकडे धाव घ्यावीशी वाटते ते काय उगीच आहे का मग !

दत्ताजीरावः पण मला स्वस्थ बसायचंय.

प्रदीपकुमारः अहो, नुसतं बसून काय करताय दत्ताजीराव ?

दत्ताजीरावः मला वाटतं, मी मघाशीच तुम्हाला सांगितलंय की या प्रश्नाचं उत्तर मला नाही सांगता येणार.

प्रदीपकुमारः म्हणजे फिरायला जाणं आणि गप्प बसणं यात काहीच फरक नाही ?मग फरक तरी काय आहे याच्यात ?

दत्ताजीरावः प्रदीपकुमार, तुम्ही असं करा.

प्रदीपकुमारः कसं ?

दत्ताजीरावः या खुर्चीवर उभे राहा.

प्रदीपकुमारः का ?

दत्ताजीरावः राहा तर खरे. ( प्रदीपकुमार बिचकत बिचकत तसे करतो.) हं आता उतरा.( उतरतो.) आता बसा त्याच खुर्चीवर.( बसतो.) आहे काही फरक ? त्या उभे राहण्यात आणि या बसण्यात ?

प्रदीपकुमारः ( बिचकत ) मला तर वाटतोय फरक --

दत्ताजीरावः ( मोठ्यांदा हसून ) अहो, आहेच फरक त्याच्यात ! त्यात वाटण्याचा काय प्रश्न आहे !

प्रदीपकुमारः खरं सांगा दत्ताजीराव. तुम्हाला फरक आहे म्हणायचंय की नाही म्हणायचंय ?

दत्ताजीरावः म्हणजे मी जे काय म्हणीन तेच बरोबर असणार आहे असं म्हणायचंय का तुम्हाला ?

प्रदीपकुमारः तुम्ही पटवून देऊ शकता.

दत्ताजीरावः म्हणजे फार तर मी बुध्दिमान आहे आणि तुम्ही समजा -- समजा म्हणतोय मी -- निर्बुध्द -- आहात -- हे एक वेळ ठीक आहे. पण बरोबर काय आहे हे कशावरून -- कशावरून ओळखायचं ?

प्रदीपकुमारः ते जाऊ द्या. जायचं का फिरायला ?

दत्ताजीरावः त्याच्यावरनंच तर निघाला नं विषय !

प्रदीपकुमारः तुम्ही कुठला विषय कुठं नेऊन भिडवाल हे काही सांगता येत नाही. तुमच्यासारखा विव्दान मनुष्य आमच्यासारख्याशी बोलतो हेच भाग्य आहे. विव्दान माणसाला बऱ्याच गोष्टी माहीत असतात. आणि तो इकडच्या गोष्टीचा संबंध त्याला माहीत असलेल्या तिकडच्या लांबच्या गोष्टीशी जोडू शकतो. आम्हाला एवढ्या गोष्टी माहीत नसतात.

दत्ताजीरावः त्यामुळं काय होतं ?

प्रदीपकुमारः काय होतं ? धक्क्यावर धक्के बसतात आणि आनंद होतो ! दारू उगीच नाही सुटली माझी ! श्रेय तुम्हाला आहे !

दत्ताजीरावः अहो प्रदीपकुमार मला नकोय श्रेयबिय !

प्रदीपकुमार : तुम्ही निस्पृहच आहात हो पण आम्हाला कृतज्ञता आहे की नाही !

दत्ताजीरावः हा गळेपडूपणा झाला मग !

प्रदीपकुमारः आम्ही पडणार तुमच्या गळ्यात ! आमचं जीवन तुमच्या पायाशी ठेवणार ! आम्हाला काय करायचंय घेऊन ते !

दत्ताजीरावः अहो, मला तरी काय करायचंय ! ?

प्रदीपकुमारः असं नका म्हणू, तुमचं जीवन महत्त्वाचं आहे.

दत्ताजीरावः अहो, माझं नाही, तुमचं जीवन घेऊन मला काय करायचंय अशा अर्थी म्हणायचं होतं मला !

प्रदीपकुमारः बघा । तेवढ्यातल्या तेवढ्यात कसा फरक पडतो बघा ! हेच तर वैशिष्ट्य आहे तुमचं !

दत्ताजीरावः मला तुमचा रागही येतो आणि दयाही येते.

प्रदीपकुमारः निस्पृह माणसालाच असं होतं दत्ताजीराव ! आम्हाला एक तर फक्त राग येतो किंवा फक्त दया येते.

दत्ताजीरावः कृपा करून असलं कुठं काही बोलू नका. बऱ्याच लोकांना गरज असते असल्या लोकांची.

प्रदीपकुमारः अहो,गरज लाख असते पण असतात किती असे लोक ? भाग्य लागतं ! तुमच्यासारख्यांची भेट होणं ही काही साधी गोष्टी नाही !

दत्ताजीरावः मग, न रागावता मी फक्त एकच सांगतो, तुम्ही पुन्हा मला भेटू नका. मला कंटाळा येतो.

प्रदीपकुमारः तुम्ही परीक्षा नका घेऊ माझी. तुम्ही रागवा, चिडा, मारा, शिव्या द्या -- मी येणार !

दत्ताजीरावः मी तुम्हाला कधी काही त्रास दिलाय का ?

प्रदीपकुमारः त्रास ? तुम्ही ? मला ? अहो, त्रास आम्ही तुम्हाला देतो !

दत्ताजीरावः तेच म्हणतोय मी ! का ?

प्रदीपकुमारः तुम्हाला नाही तर देणार कुणाला आम्ही त्रास ?

दत्ताजीरावः तुम्ही मघापास्नं ' आम्ही ', ' आम्ही ' काय म्हणताय ? गर्दी वाढवायचीय का तुम्हाला ?

प्रदीपकुमारः गर्दी असं नाही म्हणा, पण म्हणजे बोलण्याच्या ओघात जरा राहिलंच होतं. माझा एक मित्र आहे. इन्स्पेक्टर आहे. त्याला जरा तुमच्याशी ओळख करून हवी होती.

दत्ताजीरावः कशाला ?

प्रदीपकुमारः वाटतं आपलं त्याला. माझं भलं झालंय. त्याचंही व्हावं.

दत्ताजीरावः तुमचं भलं झालंय ?

प्रदीपकुमारः दारू नाही का सुटली ? ।

दत्ताजीरावः अहो दारूपेक्षा मी जास्त मादक ठरलोय तुमच्या बाबतीत ! आता माझ्यापेक्षा जास्त मादक मनुष्य भेटेपर्यंत तुमची सुटका नाही !

प्रदीपकुमारः मला तुमच्यापासून सुटका नकोय दत्ताजीराव ! रागावून, आपुलकीनं, दयाबुध्दीनं कसं का असेना, तुमच्याशी संभाषणाचा लाभ मिळावा एवढी एकच इच्छा आहे. तर चालेल का त्याची ओळख करून दिली तर ? नाही म्हणू नका.

दत्ताजीरावः त्याला काय अडचण आहे ?

प्रदीपकुमारः बघा ! अहो, माणसाच्या सुखदुःखाबद्दल तुम्ही बेफिकीर नाही राहू शकणार ! विचारलंतच ना शेवटी !

दत्ताजीरावः इन्स्पेक्टरच्या पेशाला ही असली लाचारी शोभून दिसत नाही. तुमचं एक ठीक आहे.

प्रदीपकुमारः बास ! माझं ठीक आहे म्हणालात यात सगळं पावलं मला. आता जरा त्यालाही संधी द्या !

दत्ताजीरावः अरे मी काय धंदा उघडून बसलोय काय इथं ? याला संधी द्या, त्याला संधी द्या ! शेवटी माझा काही प्रश्न आहे का नाही ?

प्रदीपकुमारः चिडू नका. तुमचा रागही क्षणिक आहे. मला माहिती आहे. जाईल. आणू का त्याला ?

दत्ताजीरावः कुणाला ?

प्रदीपकुमारः तोच -- इन्स्पेक्टर प्रभुराम. आला असतात फिरायला तर खालीच ओळख करून देणार होतो.

दत्ताजीरावः आत्ता ?

प्रदीपकुमारः उभा आहे तो बाहेर.

दत्ताजीरावः ( आश्चर्याने ) कुठे ?

प्रदीपकुमारः रस्त्यावर.

दत्ताजीरावः एवढा वेळ ?

प्रदीपकुमारः	बघा. म्हणजे आता तुम्ही म्हणताय, एवढा वेळ का त्याला उभा ठेवला ?

दत्ताजीरावः	तसं नव्हे. तो एक लाचार माणूस आहे, पण म्हणून काय तुम्ही त्याला असं उभं करावं ? तुम्ही लुबाडताय त्याला ! छ्या !

प्रदीपकुमारः	आणू का मग ? आधी म्हटलं जरा प्रस्तावना करावी, रागरंग बघावा आणि मग ठरवावं. मीच सांगितलं त्याला, म्हटलं ते ' हो ' म्हणाले तर बोलावीन. वाट बघत उभा आहे. बिचारा. तो तुम्हाला भेटायला नुसता उद्युक्तच नाही तर आतुरही झालेला आहे. बोलवू ?

दत्ताजीरावः	पण काय आहे ? कशाला भेटायचंय त्याला ?

प्रदीपकुमारः	आता कशाला !! गुणदोष ! दुसरं काय ।

दत्तजीरावः	पण काय, कारण काय आहे ?

प्रदीपकुमारः	त्यालाही दारू सोडायचीय.

दत्ताजीरावः	आणि मला धरायचंय !

प्रदीपकुमारः	नाही म्हणू नका. ताटकळत उभा आहे बिचारा.

दत्ताजीरावः	बरं जा, आणा जा, जा ! पण लौकर आटपायचं म्हणावं ! नुसते तुम्ही आलात तरी थकवा आला मला, आता हा आणखी एक !

प्रदीपकुमारः	आनंदानं होय म्हणत असलात तर आणतो ! बिचारा पहिल्यांदाच येतोय ! नाराजी नको !

दत्ताजीरावः	मग तुम्हीही चालते व्हा आणि तुमच्या त्या मित्रालाही हाकलून द्या ! चला !

प्रदीपकुमारः	अनुभवानं तुमचा राग आणि तुमचं प्रेम यात मी फरकच करत नाही ! आलोच ! एक मिनिटात आणतो त्याला ! ( जातो. दत्ताजीराव स्वस्थ बसलेले. काही क्षणांनी प्रदीपकुमार पुढे " हं, हेच त्यांचं घर, ये -- ये, ये ! " असं म्हणत येतात. मागून इन्स्पेक्टर प्रभुराम येतात.)

दत्ताजीरावः	( प्रभुरामला ) या,या ! नमस्कार !

प्रभुः	नमस्कार, नमस्कार !

दत्ताजीरावः	मी दारू सोडायचं मादक दुकान घातलंय असं यांनी सांगितलेलं दिसतंय तुम्हाला !

प्रदीपकुमारः	( प्रभूला ) म्हटलं ना, कधी विनोद करतील, कधी शिव्या देतील ! वेगळंच आहे सगळं !

दत्ताजीरावः	( इन्पेक्टरकडे पाहात ) दिसायला तर चांगले तडफदार दिसतायत.

प्रभुः	आमच्या पेशाला बिगर तडफदार दिसून कसं चालेल साहेब ? कायदेकानूनचं ज्ञान जरा कमी जास्त चालतं, पण तडफदारपणा पाहिजेच. काही काही वेळी तर नुसतं याच्यावरच भागतं. कायद्यापर्यंत पोचायची गरजच पडत नाही. फक्त एकच आहे, आपणसुध्दा हे जास्त ताणू नये. म्हणजे चांगलं आणि वाईट, गुन्हेगारी प्रवृत्ती आणि निर्दोष प्रवृत्ती यांच्यांत फार फरक करत बसायचं नाही. फरक करावा अशी कागदोपत्री अपेक्षा असते पण केला नाही तरी फारशी चूक नाही असं अंडरस्टँडिंग असतं. या दरम्यान जितकं जसं धकेल तसं धकेल. नाहीतरी कुठल्याही प्रकारे वागलं तरी धोकाच आहे.

दत्ताजीरावः	तुम्हाला एवढं समजतंय म्हणजे तुम्ही थोडेफार भ्रष्टाचारी असला पाहिजेत. नाही तर मग तुम्हाला समजून काही फारसा उपयोग नाही असं म्हणावं लागेल.

प्रभुः	तुमच्यापुढं लपवाछपवी करून काही उपयोग नाही हेही समजतं मला. तुम्ही इन्स्पेक्टरांचे इन्स्पेक्टर आहात.

दत्ताजीरावः	मी कुणी का असेना, पण तुम्हाला दारू का सोडायचीय ?

प्रभुः	काही नाही, दारू सोडूनही दारू न घेतल्याचं असमाधान न होता जगता येत असेल तर ती सुटली तरी काय बिघडतंय असा सुटसुटीत विचार आहे. मतभेद असला तर सांगा.

दत्ताजीरावः	मतभेदांना मी महत्त्व देत नाही.

प्रभुः	असं कसं ? असं कसं ?मतभेदांना महत्त्व नाही तर लोकशाही कशी टिकेल ? आपलं काय काम मग ?

दत्ताजीरावः	लोकशाहीच टिकली पाहिजे असंही काही नाही.

प्रभु	पण लोकशाही टिकलीच पाहिजे असं तरी ?

दत्ताजीरावः	काहीच टिकाऊ नसतं.

प्रभुः	( क्षणभर पाहून ) एक मिनिट. कंगवा आहे का तुमच्याकडे ?

दत्ताजीरावः	( प्र.ला ) कंगवा आण. ( प्र. विंगेतून कंगवा आणतो. प्रभुला देतो. प्रभु द.ची भांगस्टाईल बदलून त्याचा भांग पाडतो.)

प्रभुः आरसा आहे का ?

दत्ताजीरावः ( प्र.ला) आरसा आणा.( प्र. विंगेतून आरसा आणून प्रभूच्या हातात देतो. तो आरसा द.पुढे धरतो.)

प्रभुः बघा. हा चेहरा लक्षात ठेवा. तुमच्या नेहमीच्या ओळखीचा नाही. पण लक्षात ठेवा ! ( आरसा ठेवतो. खिशातून एक फोटो काढतो. द. ला दाखवतो.) हा फोटो बघा. येतंय काही लक्षात ?

दत्ताजीरावः हं !

प्रभुः आहे का नाही साम्य ? मी याच्या शोधात आहे. एका महत्त्वाच्या गुन्ह्यात हा माणूस आम्हाला हवा आहे. शोधायचा प्रयत्न तर केलाच पाहिजे.

दत्ताजीरावः मी असा भांग आयुष्यात कधी पाडला नव्हता. मला मुळात असा भांग पाडणं आवडतच नाही.( केस नीट करतो.)

प्रभुः ते बरोबर आहे. अहो, तुम्ही जर का असा भांग पाडला असता तर तुम्ही स्वतःच तो गुन्हेगार नसता का झाला ? तुमच्या आवडी आणि त्याच्या आवडी यात फरक आहे. तुम्हाला सुचणाऱ्या गोष्टी वेगळ्या, त्याला सुचणाऱ्या वेगळ्या.

दत्ताजीरावः मला एकटयानं स्वस्थ बसायला आवडतं.

प्रभुः आणि त्याला दुसरंच काही आवडत असेल.

दत्ताजीरावः त्यासाठी नाही, तुमच्या माहितीसाठी सांगितलं.

प्रभुः ओह ! अच्छा, अच्छा ! म्हणजे आम्ही जावं यासाठी !

प्रदीपकुमारः नाही, नाही, दत्ताजीराव मधूनमधून विनोद करतात !

प्रभुः आणि त्याला कदाचित कधीही विनोद करता येत नसेल.

दत्ताजीरावः ते सगळं काही एवढं महत्त्वाचं नाही.

प्रभुः नाही कसं ? नाही कसं ? मग असा भांगच का तुम्हाला महत्त्वाचा वाटतो ? त्याच्यासारखा भांग का नाही पाडत ?

दत्ताजीरावः इथं तुम्ही मला सुधारायला आलायत का माझ्याकडून सुधारून घ्यायला आलायत ? कामाचं बोला !

प्रभुः मला दारू सोडायचीय !

दत्ताजीरावः आणि मला धरायचीय !

प्रभुः वेलकम । येताय ? शिवाज रीगल आहे आपल्याकडे ! लोक तरी कायकाय देत असतात साले !
चला ।।

दत्ताजीरावः अहो, पण तुम्हाला सोडायचीय म्हणाला ना तुम्ही ?

प्रभुः आता आपलं काम तुम्ही करणार म्हटल्यावर तुम्हाला कंपनी द्यायला नको ?

दत्ताजीरावः म्हणजे एक तर दारू पिता आणि तीही भ्रष्टाचारातनं मिळालेली पिता !

प्रभुः सोडायचीय पण ! आणि कृपया सोडायचीय असं मला वाटतंय तोपर्यंत सोडवायला सुरुवात करा.

दत्ताजीरावः एवढं काही मी ते माझ्यावर बंधनकारक समजत नाही. तुमच्या मनात एक विशिष्ट गोष्ट असेपर्यंत त्या गोष्टीसाठी माझे विचार, माझं मन वापरायला मी काही तुमचा नोकर नाही. गरज तुम्हाला आहे.

प्रभुः अटक करून नीन साल्या तुला ! कुणाशी बोलतोय ! !

प्रदीपकुमारः ( धावतपळत ) अरे, अरे--

प्रभुः नाही,नाही, घाबरू नको ! दुसऱ्या एखाद्याला मी काय म्हटलं असतं ते सांगितलं ! पण यांचं ऐकू आपण !

दत्ताजीरावः माझी दाढी करून हवीय मला.

प्रदीपकुमारः त्याला नका सांगू, त्याला नका सांगू, मी करतो. मी .मी.

दत्ताजीरावः हं --

( प्र. खिशातून वस्तरा काढतो. प्रभुरामच्या हाताचा कातडी पट्टयासारखा उपयोग करून वस्तऱ्याला धार लावतो. मग दाढी करू लागतो. प्रभुरामचा हात तसाच. )

प्रदीपकुमारः ( प्रभुकडे न पाहता, दाढीचे काम चालू ठेवत ) पट्टा खाली सोड आता.( प्रभु हात ढिला सोडतो.)हां ! ठीक आहे ! दत्ताजीराव, मी मघाशी हणमंतरावांकडे जाऊन आलो, तर ते तुम्हाला शिव्या देत होते -- मी आपलं एक आपुलकीनं बोलून गेलो -- माझं नाव नका सांगू हं त्यांना -- आपली भाकरी अवलंबून आहे याच्यावर--

दत्ताजीरावः द्यूं देत शिव्या --

प्रदीपकुमारः असं नाही. तुम्हाला नियमाप्रमाणे राग आला पाहिजे. आपली भाकरी अवलंबून आहे याच्यावर --

दत्ताजीरावः तुला भाकरी पाहिजे का स्वातंत्र्य ?

प्रदीपकुमारः तुम्हाला काय आवडतं ते सांगा. तेच आपल्याला पाहिजे. आपली भाकरी अवलंबून --

प्रभुः गप ए, तिच्यायला, भाकरीसाठी मरतंय नुसतं !

दत्ताजीरावः असं नाही म्हणून चालणार प्रभुरामजी. त्याचंही बिचाऱ्याचं काम व्हायला पाहिजे.

प्रदीपकुमारः या दाढीवरनं एक आठवलं.

प्रभुः दत्ताजीराव, आपलं दारू सोडवायचं बघताय नं तेवढं --

दत्ताजीरावः अहो दारू सोडवणं हे काय एखादी कंप्लेन्ट नोंदवून घेण्यासारखं पाच मिनिटात होणारं काम आहे
का ? महिनोनमहिने लागतात या कामाला आणि मध्येच कधी दारू घेतली तर कामाला अजून सुरुवातही झाली नाही असं होत असतं. तुम्हाला सारखी अधीर टाईप माणसं भेटतात नं, त्यामुळं तुम्हालाही तशीच सवय लागलीय.

प्रभुः बरं, मला एक सांगा, दारू पीत नाही तो इन्स्पेक्टर राहूच शकत नाही असं माझे काही मित्र म्हणतात. तसं काही नाही नं ? कारण मला इन्स्पेक्टर राहून दारू सोडायचीय --

दत्ताजीरावः कशाला एवढा विचार करताय ? फुकटची तर पिताय !

प्रभुः पण तरीसुध्दा सोडली तर कुटुंबात, नातेवाईकांत, समाजात जरा मान वाढेल असं दिसतं.

दत्ताजीरावः मनाची हालचाल असते सगळी. ही हालचाल थांबली की आपण मरू असं आपल्याला वाटतं. हेच जगणं !

प्रभुः ( प्र.ला.) झाली का दाढी ! माझ्या कामाचं बघू देत आता जरा --

प्रदीपकुमारः झालीय.( वस्तरा साफसूफ करून खिशात ठेवतो.) कसे तरतरीत दिसतायत बघ आता ! एकदम ताजे ताजे !

प्रभुः ते काय वडापावमधले पाव आहेत काय ताजेताजे म्हणायला ? एवढा मोठा माणूस !

प्रदीपकुमारः ते तू मला शिकवू नकोस. मीच आणलंय तुला इथं !

प्रभुः मी चलतो -- इथं काही काम होईलसं मला वाटतं नाही.

दत्ताजीरावः म्हणजे माझा अपमान करताय तुम्ही !

प्रभुः तसा तर पुष्कळांचा करतो मी अपमान. आपली सुध्दा भाकरी अवलंबून असते याच्यावर.

दत्ताजीरावः मला हळूहळू तुमची ओळख पटत चाललीय. तुमचा भूत, वर्तमान आणि भविष्य सगळं दिसायला लागलंय.

प्रभुः मग आता पुढचं प्रमोशन कधी आहे ते सांगा बरं --

दत्ताजीरावः माणसानं इतकं सवयीचं गुलाम असू नये.

प्रभुः नोकरी घालवायची नाहीय मला. नोकरीवर कुणाला ठेवलंय ते नक्की असावं लागतं. सवयी पाहिजेतच.

प्रदीपकुमारः तुला वाद घालायला आणलेलं नाही मी इथं !

प्रभुः मला शिकवू नको भडव्या, चॅप्टरकेस करून सामनेवाला करून टाकीन तुला --

प्रदीपकुमारः अरे, अरे ! मी मित्र आहे तुझा -- विसरलास का काय !

प्रभुः मित्र असला म्हणून काय झालं ! सरकारनं ज्याच्याकडं काही पावर दिलीय असा माणूस आहे मी ! शांतता आणि सुव्यवस्था राखण्यासाठी मी काहीही करू शकतो ! हां ! ' सामनेवाला ' म्हणजे काय माहीत आहे का !

प्रदीपकुमारः नाही -- समोरचा असेल --

प्रभुः सामनेवाला म्हणजे एक उपद्रवी माणूस -- सामाजिक शांतता, सुव्यवस्था आणि सुरक्षिततेला बाधा आणणारा --

प्रदीपकुमारः मी तसा आहे ?

प्रभुः असण्या नसण्याचा काय प्रश्न आहे ? ठरवणारा कोण आहे ?

प्रदीपकुमारः तू !

प्रभुः बास ! हे लक्षात ठेवायचं !

प्रदीपकुमारः पण मला तर उलट शांतता आवडते !

प्रभुः शांतता सगळ्यांनाच आवडते -- आपल्याला शांतता मिळवण्यासाठी दुसऱ्याच्या शांततेचा भंग करायची पध्दत असते !

प्रदीपकुमारः मी साधा, सर्वसामान्य माणूस आहे -- माझ्या मेंदूला जास्त ताण सहन होत नाही. त्यामुळं सलग जास्त वेळ मी कुठलंही काम करू शकत नाही. पण मला दुसऱ्यांना जमेल तेवढी मदत करायला आवडते. मी स्वतः मात्र थोडा फार अन्यायसुध्दा सहन करतो.

प्रभुः काही गरज नाही तुला अन्याय सहन करण्याची ! मी तुझा मित्र असून उपयोग काय मग ? काय त्रास आहे तुला ?

प्रदीपकुमारः आता उदाहरणार्थ बायको सतत आजारी असते -- काय करणार !

प्रभुः एकदोन गोळ्या जास्त देऊन टाक सालीला -- मी निपटून देईन तुला --

प्रदीपकुमारः नाही, नाही, तसं नाही -- पण --

प्रभुः तुझ्यासारख्या पुचाट लोकांच्या हातनं काही व्हायचं नाही -- काहीतरी गुन्हेगारी ही पाहिजेच माणसात, नाहीतर जगण्यात काही अर्थ नाही -- तुमच्यात गुन्हेगारी प्रवृत्ती जेवढी कमी तेवढे तुम्ही बुळचट होता -- भित्रट मनुष्य म्हणून जगावं लागतं मग --

प्रदीपकुमारः पण असा जोर करायला जमलं पाहिजे ना --

प्रभुः मग एक नुसता चांगला, उपयोगी मनुष्य म्हणून जग -- तुझा विचार कुणीही करणार नाही -- तू यशस्वी होणार नाहीस -- तुला कामाचा मोबदला मिळणार नाही.

प्रदीपकुमारः मी सारखा अवलंबून असतो दुसऱ्यावर--बहुतेक मी एक कमी शक्तीचा माणूस म्हणूनच जन्माला आलो --

प्रभुः म्हणजे आम्ही जास्त शक्तीचे जन्माला आलो असं तुला म्हणायचंय -- म्हणजे आम्ही स्वतः कष्टानं, धोके पत्करून असे घडलो हे महत्त्वाचं नाही -- असं तुझं म्हणणं !

प्रदीपकुमारः नाही,नाही !तुमच्या बाबतीत तेच खरं आहे !मीच फक्त असा जन्मापलीकडं गेलो नाही-- घाबरत गेलो --

प्रभुः असू दे !आता चिंता करू नको-- माझा आधार शंभर टक्के धरून चाल ! कोण तुला काय करतो ते बघू !

प्रदीपकुमारः मला असं नुसतं बोलतासुध्दा येत नाही.

प्रभुः असं नुसतं जगून तरी काय करणार तू ! धोका वाटला पाहिजे आपला -- आणि दुर्दैवानं खरंच एखादा गुन्हा करायचा प्रसंग आला तर केला पाहिजे गुन्हा -- आपण थोडे तिरसट, संतापी म्हणून प्रसिध्द असलो की सहसा असा प्रसंग येतही नाही -- एकमेकांपासून सावध राहायची गरज वाटतेच सगळ्यांना-- आपल्याला कुणी घाबरायची गरज नाही असं वागलं की किंमतच जाते माणसाची --

प्रदीपकुमारः मला ज्यांच्याकडून चांगलं शिकायला मिळतं अशा दोन व्यक्ती आहेत -- एक म्हणजे हे दत्ताजीराव आणि दुसरा तू !

प्रभुः या दत्ताजीरावचं चांगलं शिकवणं -- आपलं दत्ताजीरावांचं चांगलं शिकवणं वेगळं असेल पण जरा --

प्रदीपकुमारः वेगळं म्हणजे जवळजवळ संपूर्ण निराळंच असतं -- पण तुला जशी एक माझ्याबद्दल आपुलकी वाटते तशीच त्यांनाही वाटते -- आपण तर शाळेत एका वर्गात होतो -- त्यांची न् माझी तर अलीकडची गेल्या दोन-तीन वर्षांतली ओळख आहे -- तू पण शाळेत असल्यापासून जरा दांडगटच होतास हं --

प्रभुः आमचे पिताजी तर मी वाया गेलोय असं धरून चालले होते ! पण युनिफॉर्ममध्ये पहिल्यांदा जेव्हा पाहिलं त्यांनी मला तेव्हा आनंदाश्रूच आले त्यांच्या डोळ्यांत ! प्रेम ! आयुष्यात प्रेम हे पाहिजेच ! माणूस जगतोच मुळी प्रेमासाठी !

प्रदीपकुमारः मला मात्र असल्या खास काही आठवणी नाहीत --

प्रभुः आठवणींची देवाणघेवाण करता येत नाही म्हणून -- नाहीतर मी माझ्या चार आठवणी तुला दिल्या असत्या -- खूप आहेत माझ्याकडे --

प्रदीपकुमारः यातच तुझा दिलदारपणा आणि उमदेपणा दिसून येतो -- म्हणूनच मला तुझा अभिमान वाटतो -- बघ, माझे डोळे ओलसर झालेत.

प्रभुः ( त्याच्या पाठीवर थोपटून ) तू कसलीही चिंता करायची नाही म्हणून सांगितलं ना तुला -- बास ! आपल्या डिपार्टमेंटचं तुझं काही काम असलं तर सांग ! झालं म्हणून समज !

प्रदीपकुमारः दत्ताजीराव एक मला असंच आपुलकीनं वागवतात -- मी कधीकधी थोडंसं हुशारीनं बोलायचा प्रयत्न केला तरी चालवून घेतात ते --

प्रभुः ( दत्ताजीराव स्वस्थ, निश्चल --) करतो काय हा माणूस ?

प्रदीपकुमारः रिटायर व्हायचेत आजून -- सरकारी ऑफिसात आहेत --

प्रभुः व्हेरी गुड ! टिकून राहणारा माणूस आवडतो आपल्याला ! तो टिकून राहतो याचा अर्थच अनेक मानापमान, कष्ट, डावपेच करणारी माणसं आणि संकटं यांना टक्कर देऊन टिकून राहतो -- आणि स्वतःमध्ये थोडा टणकपणा, थोडी बेफिकिरी, थोडी हुशारी आणि थोडा हलकटपणा असल्याशिवाय शक्यच नसतं हे --

प्रदीपकुमारः दत्ताजीराव आणि हलकटपणा ? नाही, नाही !

प्रभुः अरे, हलकटपणा म्हणजे वाईट या अर्थी म्हणत नाहीय मी --

प्रदीपकुमारः मग ?

प्रभुः अरे हलकटपणा करणाऱ्याच्या दृष्टीनं त्यात वाईट काय आहे ? ज्याला त्याचा त्रास होतो तो त्याला वाईट म्हणेल ! आपण स्वतःच्या दृष्टीनं जगावं ! दुसऱ्यांना काय वाटतं याच्यावर भर द्यायची सवय लागली की फार संकुचित होतो माणूस ! चांगलं आणि वाईट याच्यात फरक असतो असं समजण्याची फक्त मर्यादित बुध्दी असते त्याची --

प्रदीपकुमारः या पध्दतीनं म्हणजे सारखं काहीतरी घडतच राहणार -- पोलिसांची गरज नाही असं कधीच होणार नाही--

प्रभुः काय वेडाबिडा आहेस काय ! पोलिस नाही असा कुठं समाज असतो का वेड्या ! कुठल्याही देशात पोलिस पाहिजेतच !

प्रदीपकुमारः मग गुन्हेगारांना शिक्षा कशाला द्यायची ?

प्रभुः नको द्यायला ? पोलिसांचं काम काय मग ? कायद्याप्रमाणे शिक्षा व्हायला पाहिजे हे तर महत्त्वाचं आहे नं --

प्रदीपकुमारः आपण इतकं बोलतोय पण दत्ताजीराव बघ कसे स्वस्थ बसलेत !

प्रभुः हे स्वतःचं महत्त्व माजवणारं बोलणंच आहे त्यांचं एक प्रकारचं !

प्रदीपकुमारः बहुतेक वेळा शांत असतात पण ते --

प्रभुः ( पाहून ) च्यायला, झोपले का काय बसल्याबसल्या ? डोळे मिटलेले दिसतायत --

प्रदीपकुमारः मला वाटतं कधीकधी समाधी वगैरे लावत असावे ते -- त्यांना जमत असणार आहे ते --

प्रभुः म्हणजे आपल्या कामाकडं लक्ष द्यायचं काही लक्षण दिसत नाही यांचं -- मी आल्यापासनं बघतोय, भडवा सीरिअसली काही घेतच नाहीय -- मला तर भोंदूगिरीचीच शंका येतीय --

प्रदीपकुमारः नाही, नाही. ते स्वतःहून काहीच म्हणत नाहीत -- किंवा असा फायदा वगैरे करून घेत नाहीत --

प्रभुः एकदा पार्श्वभूमी तयार झाली की तेही करतील.

प्रदीपकुमारः एक सांगतो मी -- माझ्या परीनं मला खंत असते -- तुझ्या परीनं तुला ताण असेलच -- पण या माणसाला काही त्रास असेलसं वाटत नाही मला --

प्रभुः इम्पॉसिबल ! कसलाच काहीच त्रास नाही असा माणूस असणंच शक्य नाही -- असं जर कुणी म्हणत असेल तर तो काहीतरी डाव टाकतोय असं खुशाल समजावं. ( दत्ताजीरावच्या डोक्यावर हात ठेवून ) ही बॉडी तर सेम आपल्यासारखीच आहे ना ?

प्रदीपकुमारः त्यांच्या कपाळावर निरखून बघ -- तिथं एक चक्र दिसेल तुला --

प्रभुः यांचेपण केस थोडेफार पांढरे झालेले आहेतच --

प्रदीपकुमारः त्यांच्या पायांचे अंगठे केवढे मोठे आहेत बघ --

प्रभुः प्रत्येक बोटावर नखं आहेत पण --

प्रदीपकुमारः दोन्ही कानांच्या मागच्या बाजूला तीळ आहेत --

प्रभुः असली लक्षणं असून काय उपयोग ? सरळ नेहमीप्रमाणे जन्म घेऊनच आलेत ना ते !

प्रदीपकुमारः माणसांनी सुखदुःखाच्या चक्रातून बाहेर पडावं हीच त्यांना तळमळ असते --

प्रभुः तळमळ असलेला माणूस असा झोपत नाही --

प्रदीपकुमारः ते तुझं काही वाकडं करू शकत नाहीत या भावनेनं असलं स्पष्ट बोलतोयस तू --

प्रभुः तूही बोल ! तुझं तरी काय वाकडं करणार आहे हा भडवा ! नोकरी करून नंतर गप घरात बसणारी माणसं कुणाचंच काहीच वाकडं करू शकत नाहीत --

प्रदीपकुमारः माझी दारू सुटली त्यांच्यामुळं ! हे तरी खरं आहे !

प्रभुः म्हणूनच आलोय नं मग आपण इथं !

प्रदीपकुमारः कदाचित चुकीच्या वेळी आलो आहे आपण इथं -- त्यामुळं तुझं इम्प्रेशन खराब झालंय त्यांच्याबद्दल. मला तरी ते चांगले वाटतात.

प्रभुः लग्न, फॅमिली वगैरे काही नाही वाटतं ?

प्रदीपकुमारः नाही. पण मी अशी खोलात जाऊन चौकशी केली नाही कधी. एकदोनदा विषय काढला होता पण त्यांनी टाळला होता.

प्रभुः तेच ! काहीतरी दुःखाचा दणका बसला असेल. असं झालं म्हणजे एखादा माणूस सगळ्या गोष्टींतून इंटरेस्ट काढून घेतल्यासारखा वागू शकतो. तरीपण इतर कुणी नातेवाईक वगैरे ?

प्रदीपकुमारः मला तरी कधी कुणी आलेलं दिसलेलं नाही.

प्रभुः मग काय नुसता बसून असतो हा माणूस ?

प्रदीपकुमारः वाचत असतात कधीकधी काही तरी.

प्रभुः काय वाचतात ?

प्रदीपकुमारः काही तरी संतवाङ्मय किंवा अध्यात्मिक असं काही तरी असतं.

प्रभुः ते वाचून इकडं तुमच्यासारख्यांना स्वतःचं म्हणून सांगत असणार आहे हा माणूस. लबाड दिसतो साला !

प्रदीपकुमारः तू काय त्यांच्याबद्दल वाईट बोलायचं असं ठरवून बोलतोयस का ? तुला काहीच कसं त्यांचं चांगलं दिसत नाही ?

प्रभुः आता हा जागा झाला ना की मी निरनिराळे आरोप करणार आहे याच्यावर -- हा जखमी होतो की नाही याची टेस्ट घ्यायचीय मला -- चमत्कार दाखवतात साले ! याच्यावर गोळी झाडली तर मरेलच की नाही हा ?

प्रदीपकुमारः तसं तर देवही मेले आणि संतही मेले पण दुःखाचा त्रास होत असतो म्हणून मार्ग शोधतच असतो ना माणूस ! ते मेले म्हणून काय त्यांनी सांगितलेलं खोटं थोडंच पडतं ! आणि मला तरी ही माझ्या आयुष्यातली एक महत्त्वाची व्यक्ती वाटते. त्यांना खोटं पाडायचा प्रयत्न करू नकोस. मला आधारहीन करून तुला काय मिळणार आहे ?

प्रभुः तुझीसुध्दा अंधश्रध्दा घातक आहे नं पण ! समाजात असल्या गोष्टींना प्रोत्साहन कसं देता येईल ?

प्रदीपकुमारः मग तू सुध्दा आलासच ना इथं !

प्रभुः पण मी असा अंधश्रध्देच्या आहारी जाणार नाही. मी जवळजवळ ओळखलंय आता या माणसाला. याला उघडाच पाडला पाहिजे. मी दारू सोडायचा विचार सोडून दिलेला आहे.

प्रदीपकुमारः अरे असं नको करूस ! तुलाही यांचं महत्त्व पटावं म्हणून आणलंय मी इथं !

प्रभुः तू आणलं नसतंस तरी याच्या भोंदूगिरीमुळं यावंच लागलं असतं मला.

प्रदीपकुमारः मला तर असं वाटतंय की दारू सोडायची तुझी इच्छा वरवरची असेल. खरी तुला दारू सोडायचीच नाहीय. म्हणून तू दत्ताजीरावांबद्दल वाईट बोलतोयस.

प्रभुः गप ए, साल्या, माझं मेंटल ॲनॅलिसिस करतोस काय ! तू भित्रा आहेस म्हणून तुला गरज आहे या भोंदू माणसाची ! म्हणून तू चांगलं बोलतोयस !

प्रदीपकुमारः तुला सगळीकडं मान मिळवायची सवय आहे. दत्ताजीरावांनी तुला जास्त काही भाव दिला नाही म्हणून तू असं म्हणतोयस -- हे चांगलं नाही.

प्रभुः अरे वेड्या, चांगलं न वाईट यातला फरक मला नको शिकवूस ! भलेभले बघितलेत मी ! पाच मिनिटात भाषा बदलतात लोक ! मतं बदलतात ! माहिती बदलतात !

प्रदीपकुमारः तू माझा मित्र आहेस म्हणून मी तुला इथं आणलं. तुझी इच्छा नव्हती तर यायचं नव्हतंस. खरं तर दत्ताजीराव हा एक अद्‌भूत चांगला माणूस आहे.

प्रभुः पण आता मी आलोय तर नीट बघूनच जाणार. तुमच्यासारख्या भोळ्याभाबड्या लोकांना नादी लावणारा हा माणूस सामाजिक सुरक्षिततेच्या दृष्टीनं धोक्याचा वाटतोय मला.

प्रदीपकुमारः तुला सगळीकडं गुन्हेगारच दिसतात. मन विकृत आहे तुझं.

प्रभुः माझं मन विकृत आहेच. सगळयांचं विकृतच असतं. तुझं नाही ? या दत्ताजीचं नाही ? एकमेकांच्या विकृतींची झळ एकमेकांना पोचणारच. आता मी इथं आलोय तर माझ्या विकृतीचा डाग इथं मी पाडणारच.

प्रदीपकुमारः म्हणजे काय करणार आहेस तू ? दत्ताजीरावांना कृपया त्रास देऊ नकोस. मी तुला इथं आणलंय. शिक्षा मला दे हवी तर.

प्रभुः दत्ताजीराव काय तुझा नवरा आहे काय ? त्याची बायको असल्यासारखं रक्षण करतोयस त्याचं ?

प्रदीपकुमारः त्यांना अरेतुरेची भाषा वापरू नकोस. निष्कारणच.

प्रभुः आमची ती नॉर्मल भाषा आहे. समोरच्या माणसाला क्षुद्र लेखून वागलं की त्याच्या मर्यादा स्पष्ट होतात आणि खरं बाहेर पडतं. माणसाचा अपमान केला की त्याच्यातल्या चांगल्या क्वालिटी -- म्हणजे निरुपद्रवीपणा -- या मार खाऊन बाजूला होतात. मग फक्त उपद्रवी गुणधर्म स्पष्ट उरतात आणि आपल्याला नीट पाहता येतात.

प्रदीपकुमारः आपण जाऊ या !

प्रभुः थांब ! हा भडवा जागा होऊ दे !

प्रदीपकुमारः नको -- चल -- बास झालं !

प्रभुः ( दरडावून ) थांब म्हटलं ना !

प्रदीपकुमारः फक्त गरीब, निरुपद्रवी लोकांच्यावर चालते ही तुमची अरेरावी.

प्रभुः राहता कशाला असे लाचार ? तुमच्या गांडीत नसतो दम आणि गुन्हे करायला जाता आणि गुन्हेगार म्हणून सापडला की मनस्ताप होऊन मरता. गुन्हे करून वर या भडव्यांची इमेज शाबूत राहिली पाहिजे. इमेज मेली की हे मेले.

प्रदीपकुमारः तुझ्यासारख्यांवरही येतात प्रसंग ! सांगू का ?

प्रभुः हं सांग सांग --

प्रदीपकुमारः तुझ्यासारख्याच एका इन्स्पेकटरच्या हातून थोड्याशा चकमकीत एका स्मगलर गँगमधला एक महत्त्वाचा माणूस मेला. त्या गँगनं त्या इन्स्पेक्टरला चिठ्ठी पाठवली --' उद्या सकाळी साडेअकराच्या आत तू या जगातून नाहीसा झालेला असला पाहिजेस -- नाहीतर तुझी बायको आणि दोन्ही मुली यांचे खून होतील. निवड तू करायची आहेस. ' त्यानं शेवटी सकाळी अकरा वाजता स्वतःच्या डोक्यावर पिस्तूल झाडून आत्महत्या केली. एका पोलिसानंच मला ही हकीगत सांगितली. पेपरात फक्त आत्महत्या केली -- एवढंच आलं होतं. ती एक रात्र त्यानं कशी घालवली असेल याचा विचार करून बघ जरा म्हणजे कळेल.

प्रभुः ही केस मला माहिती नाही असं वाटतं का बाळ तुला ! असे प्रसंग आमच्यावर येऊ शकतात -- या सगळ्याचा मोबदला पगारात नसतो आणि म्हणूनच आम्ही लाचखोर, नालायक, विकृत, व्यसनी आणि क्रूर असणं समर्थनीय आहे ! समाज आमच्याकडून ही अशी अपेक्षा करतो तर आम्हालाही असं असणं भाग आहे ! सहनच करावं लागेल ते !

प्रदीपकुमारः तू मला बुळचट म्हणत असलास तरी मी असला भयानक तरी होणार नाही --

प्रभुः जरा बदल कर -- बुळचट असणं म्हणजेच भयानक न होणं !

प्रदीपकुमारः पण तू दत्ताजीरावांना त्रास देऊ नकोस -- चल -- जाऊ या आपण --

प्रभुः नो !( दत्ताजीरावांजवळ जाऊन, त्यांच्या खांद्यावर जोरात थापटी मारून -- ) ए दत्त्या -- साल्या कुणाला नाटकं दाखवतोस ! झोप लागलीय काय तुला भोसडीच्या ! ( दत्ताजीराव डोळे उघडून पाहतात. )

दत्ताजीरावः हं -- तुम्हाला दारू सोडायचीय नाही का --

प्रभुः दारू सोडायला नाही, तुला धरायला आलोय भडव्या मी ! भोळ्याभाबड्यांना गंडवायचे हे धंदे कधी सुरू केलेस ! तुला ओळखणारा कुणी भेटणारच नाही, असं वाटलं काय तुला ! बोल !

दत्ताजीरावः म्हणजे काय झालं काय तुम्हाला इतकं चिडायला ?

प्रभुः अरे वा रे इनोसंट ! एक लाथ घातली की येशील ठिकाणावर --

प्रदीपकुमारः प्रभुराम हे चुकतंय तुझं, निष्पाप माणसाला उगीचच त्रास देऊ नकोस --

प्रभुः बोल, आहे का तुझ्यात काही अशी एक्स्ट्रॉऑर्डिनरी पावर ? मेलेल्याला जिवंत करू शकतोस तूं ?

दत्ताजीरावः नाही, पण मी असं कधी म्हटलेलं नाही --

प्रभुः मग हे अध्यात्मिक पुस्तकं वाचायचं काय नाटक आहे ? लोकांना नादी कशाला लावतोस ?

दत्ताजीरवः मी कधीच असा कुणाला नादी लावायचा प्रयत्न केलेला नाही.

प्रभुः साल्या, तुला आतच घ्यायला पाहिजे, असं मी इथं बोलतोय ती अध्यात्मिक भाषा तुला कळणार नाही --

दत्ताजीरावः बरं, मी काय केलं पाहिजे असं तुमचं म्हणणं आहे !

प्रभुः हां ! असा लायनीवर ये ! बोल, ही अध्यात्मिक पुस्तकांची काय भानगड आहे ?

दत्ताजीरावः सांगतो. भानगड काही नाही. लहानपणापासूनच माझं आयुष्य संकटं, दुःख आणि मनस्ताप यांनी भरलेलं आहे. त्यामुळं चेपला गेलेला, उव्दिग्न झालेला आणि निराशाग्रस्त असा मी माणूस आहे. हे तर सगळं एकामागोमाग एक असह्यपणे चालूच आहे. पण मग मी जगतो म्हणजे काय ? मला दुःख होतं म्हणजे काय होतं ? माझ्या भूतकाळामुळं कमकुवत झालेली ही मनःस्थिती घेऊनच मला उरलेलं आयुष्य जगावं लागणार का -- असे प्रश्न मला पडत गेले -- त्यामुळं मी या प्रश्नांचा विचार करणारी पुस्तकं वाचायला लागलो. या प्रश्नांशिवाय मला काहीच महत्त्वाचं वाटत नाही.

प्रभुः अरे वारे गब्रू ! कळली का मग उत्तरं ! सापडली ?

दत्ताजीरावः नाही. काहीही कळलेलं नाही मला --

प्रभुः ( विजयी हास्य करून प्रदीपकुमारकडे पाहात -- ) बधा ! प्रदीपकुमार बघा ! काहीही कळलेलं नाही !

प्रदीपकुमारः म्हणून काय झालं --

दत्ताजीरावः ज्यांच्यावर असे प्रसंग आले नाहीत त्यांना असं वाटतं की आपण सुरक्षित आहोत -- आपलं ठीक आहे -- पण कुणाला, कधी, कसली ठोकर बसेल सांगता येत नाही -- मला तर सगळं असुरक्षित वाटतं. खात्री नाहीच कशाची.

प्रभुः ठीकाय,ठीकाय !सध्या मी सोडून देतो तुला. जास्त हुशारी करायला लागलास तर मात्र याद राखून ठेव ! ओके ! अब हम यहाँ बैठके शराब पीनेवाले है ! काही हरकत ?

दत्ताजीरावः माझी काहीच हरकत नाही.

प्रदीपकुमारः कशाला मुद्दाम इथंच अगदी ?

प्रभुः तू गप ! घर कुणाचं आहे ?

प्रदीपकुमारः पी मग !

प्रभुः तसं नाही बेटा ! पाणी, ग्लास इत्यादी सर्व साहित्य आणणे ! ( खिशातून दारूची बाटली आणि शेवपुडी काढतो.) लाव !

दत्ताजीरावः दे प्रदीपकुमार -- ( प्रदीपकुमार नाराजीनं तयारी करू लागतो. )

प्रभुः सुखदुःखं प्रत्येकाला असतात. सुख असेल तेव्हा सुख, दुःख असेल तेव्हा दुःख ! का आणि कसं विचारत बसणं म्हणजे मूर्खपणा आहे. उपभोग घ्या आणि सहन करा ! बास ! धिस इज लाईफ ! ( दत्ताजीरावांना ) डू यू अंडरस्टँड ! धिस इज लाईफ ! लिव्ह इट ! डोंट थिंक ! एखाद्या जनावराचं जे होऊ शकतं तेच आपलंही होऊ शकतं ! एखादं जनावर जसं तडफडू शकतं तसेच आपणही तडफडू शकतो ! रक्त वाहून गेलं, शक्ती संपली की मरू शकतो ! तुम्ही लोक निष्कारण वेळ घालवता याच्यावर. जे आहे ते आहे. व्हॉट कॅन यू डू अबाऊट इट ! ( प्यायला सुरुवात करण्यापूर्वी ) तुम्ही तर पिणार नाही !?ऑल राईट ! चीअर्स !( प्यायला सुरुवात करतो.) एखाद्याला राग अनावर होतो, तो खून करतो ! एखाद्याच्या मोठ्या फायद्याच्या आड कुणीतरी येत असतो, तो त्याचा खून करतो ! एखाद्या माणसाला अपमान सहन होत नाही, खून ! सापळे रचून, शांतपणे, विचारपूर्वकसुध्दा खून करणारे लोक असतात ! अशी माणसं, असे प्रसंग जमूनच येतात ! त्याला काय करणार ! घडणारच मग असं ! जन्माला येताना काही माणूस ठरवून येत नाही की, आपल्याला खून करायचाय म्हणून किंवा आपल्याला खून होऊन मरायचंय म्हणून ! पण होतं ! हो जाता है ! माणसं एकमेकांच्या आड येणार नाहीत, एकमेकांचे अपमान करणार नाहीत, दुसऱ्याची चांगली वस्तू आपल्याला मिळावी असं कुणाला वाटणार नाही -- असं तर होऊ शकत नाही -- स्कूलका बच्चा भी ये जानता है ! ( बाहेरून दारावर थाप पडते. " दत्ताजीराव ! " अशी हाक येते.) कोण भडवा टपकला या वेळी ? हकाल देव साले को ! नकोय चौथा इथं -- ( दत्ताजीराव दाराकडे जात असताना अंधार - पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा दत्ताजीराव जागेवर बसलेले. काही वेळ गेलेला आहे. प्रभुराम अजून पितोच आहे.) तर सांगतो तुम्हाला -- माझा थोरला भाऊ -- कोण -- थोरला भाऊ -- फार चांगला ! वाईट वाटतं -- संबंध बिघडले आमचे -- तो माझ्या बायकोच्या

बाबतीत बरोबर वागत नाही अशी मला एकदा शंका आली -- पुन्हा एकदा तसंच दिसून आलं -- मग तिसऱ्यांदा, चौथ्यांदा -- मग मी भडकलो --खात्रीच पटली -- भडकलो -- खाडकन कानसुलात वाजवली -- त्याला वाटलं नव्हतं बहुतेक -- मी स्पष्ट सांगितलं की तुझं हे असं आहे -- रडायला लागला -- हेच ओळखलंस का मला इतक्या वर्षांत असं म्हणायला लागला -- हादरूनच गेला अगदी -- म्हटलं ही ढोंगबाजी माझ्यापुढं नकोय ! (रडायला लागतो.) ही ढोंगबाजी नकोय म्हटलं माझ्यापुढे ! फार रडला तो ! फार रडला !..

.त्यानंतर आम्ही भेटलो नाही...बोललो नाही...

प्रदीपकुमारः पण खरंच असा हेतू होता का त्यांचा ?

प्रभुः अजून तरी मला वाटतं की त्या वेळी -- त्या वेळी मला जे वाटलं ते बरोबर होतं -- ( रडतच ) पण माझ्या चांगल्या,प्रेमळ भावाशी माझी ताटातूट झाली...त्यालाही झेपलं नाही ते ...तब्बेत खंगत गेली त्याची...माझा भाऊ...माझा भाऊ ...!( काही क्षण...पुन्हा पितो...) असं घडतं...सगळं तुमच्या आवडीचं घडत नाही...तो तसा वागला नसता तर काही प्रश्न आला नसता...आला असता ?

प्रदीपकुमारः किंवा तू दुर्लक्ष केलं असतंस तर !

प्रभुः कसं करणार दुर्लक्ष ! मलाही सहन नाही झालं ते ! लक्षात आल्यावर भडकण्यासारखंच होतं ते--( पितो--) ... मी आज किती प्रॉपर्टीचा मालक आहे माहीत आहे ? ...सांगतो...( पुन्हा पितो...) सांगतो...एक मिनिट...( पडतो. आडवा होतो.) एक मिनिट... सांगतो...( झोपी जातो.)

प्रदीपकुमारः फार प्यायलाय तो...आता उठत नाही एवढ्यात...

दत्ताजीरावः हं --

प्रदीपकुमारः काही वेळापूर्वी कसा गुरगुरत होता -- आता निव्वळ आपल्या दयेच्या आधारावर पडलाय तो ...

दत्ताजीरावः हं --

प्रदीपकुमारः तुम्ही जर परवानगी दिलीत तर आता खलास करू शकतो मी त्याला...तो ज्याला बुळचट म्हणत होता त्याच्या हातनं मरणं हे त्याला चांगलं बक्षीस होईल...

दत्ताजीरावः हं -- मित्र आहे तो तुझा --

प्रदीपकुमारः हो, आहे ना ! चांगला मित्र आहे. जिवाला जीव देणारा ! पण त्याला जसा मित्र हवा असतो तसे आपण त्याचे मित्र असेपर्यंतच ! हे कळतं ना आपल्याला ! मग ती मैत्रीही एक अत्याचारासारखी सहन करण्याची गोष्ट होते ! काहीही होवो ! घडू शकेल हे माझ्या हातून ! देताय परवानगी ?

दत्ताजीरावः नको. झोपू दे त्याला. सकाळी जागा झाला की जाईल.

प्रदीपकुमारः प्रॉपर्टी आहे म्हणतो भडव्याकडं --( दत्ताजीराव जरा चकितपणे पाहतात.) पण दारू पिऊन न खाता झोपलाय ! आणि तुम्ही परवानगी दिलीत तर परत उठायचा प्रश्नच येणार नाही --मला तरी वाटतंय की आयुष्यात एक तरी हे असं करावं -आताच चांगली संधी आहे -- तुमचाही फार अपमान केलाय त्यानं --

दत्ताजीरावः असू दे--एवीतेवी मी दुःखानं सडलेलाच माणूस आहे--चार अपशब्दांनी माझं काय विशेष बिघडायचंय ?

प्रदीपकुमारः तुम्ही ऐकत होता तो बोलत होता ते ?

दत्ताजीरावः नाही, मला झोप लागली होती. थकलो होतो.

प्रदीपकुमारः माझं ऐकलं असतंत, फिरायला गेलो असतो तर थोडंफार बोलून बाहेरच्या बाहेर घालवता आलं असतं त्याला. हा एवढा ताप झाला नसता...खरं म्हणजे मलाच कळायला हवं होतं. मी तुमच्याकडे आणायलाच नको होतं त्याला. पण माझा हेतू चांगला होता --

दत्ताजीरावः काय झालं असतं--नसतं याला काही मर्यादा नाही. प्रत्यक्षालाच फक्त मर्यादा आहे. या प्रत्यक्षाच्या मर्यादेतच जगायचं आहे. या प्रत्यक्षाच्या चक्रातनं सुटका नाही. आपली शरीरं, आपले अनुभव हेच सगळं प्रत्यक्ष ! जाणार कुठं !

प्रदीपकुमारः ( काही क्षणांनी ) मी जन्मलो तेव्हा माझं वजन अगदी कमी होतं -- जगणार की मरणार याची खात्री नव्हती. पण वाचलो. शिक्षणात प्रगती झाली नाही. सारखं मला इतरांच्यावर अवलंबून राहायची सवय झाली. आपल्याला जर सारखं सगळ्यांवर अवलंबूनच राह्यचं आहे तर बुळचट नाही तर काय होणार माणूस ? काय होणार दुसरं ? आई - वडिलांनी नाव ठेवलं -- प्रदीपकुमार ! वा रे प्रदीपकुमार !

दत्ताजीरावः जगणं म्हणजे आपल्याला ओळखण्याची वैशिष्ट्यं वाढवत नेणं !

प्रदीपकुमारः तुम्हाला असं काहीतरी सुचतं, लक्षात येतं, मला असं काहीच सुचत नाही...मला परवानगी द्या तुम्ही...एक

मिनिट तरी मला बुळचटपणा सोडू द्या... याचं टाळकं सडकून खलास करतो मी याला ...

प्रभुः ( धुंदीतच ) कोण आहे ? ( ओरडतो --) कोण आहे ? ( पुन्हा शांत पडून...)

दत्ताजीरावः नको, तसं काही करायचं नाही. त्याचे कपडे सैल कर. पट्टा सैल कर...पडू दे त्याला...

प्रदीपकुमारः तुमच्यावरही अवलंबून आहेच ना मी ! ( नाराजीनं जातो. प्रभुरामचे कपडे, पट्टा सैल करू लागतो. दत्ताजीराव बसून. बाहेरून एक कुत्रं रडल्याचा आवाज येऊ लागतो...)

... पडदा पडत जातो ...



पत्ता -चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा.
चिंतामणीनगर,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११ ००९.

**( दूरध्वनी - ४२२ ७८४७. )**